**राष्ट्रपुरुष / थोर व्यक्ती यांचा पुतळा उभारण्यास परवानगी देण्यासाठी मार्गदर्शक तत्वे विहीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः स्मारक-३१०२/८८४/प्र.क्र.१२२/२००२/२९,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २ फेब्रुवारी,२००५

**शासन निर्णय :**

राज्यातील विविध गावांत /शहरात/ सार्वजनिक ठिकाणी राष्ट्रपुरुष / थोर व्यक्ती यांचे पुतळे बसविण्याबाबत राज्य शासनाकडे अनेक मागण्या येत असतात. शासन राष्ट्र पुरुष/थोर व्यक्ती यांचे पुतळे उभारण्यासाठी कोणताही निधी उपलब्ध करुन देत नाही. अशी कामे करावयाची झाल्यास ती स्थानिक लोकांच्या पुढाकारातून,लोक वर्गणीतून व्हावी अशी शासनाची अपेक्षा आहे. ज्या संस्था पुतळे उभारण्याबाबत परवानगी मागतील त्या नोंदणीकृत संस्था असणे आवश्यक आहे. पुतळे उभारण्यासाठी परस्पर शासनाकडे अर्ज न करता असे अर्ज जिल्हाधिका-यांकडे करणे आवश्यक आहे. पुतळे उभारण्यासंदर्भात परवानगी देण्याच्या प्रस्तावाची छाननी करण्यासाठी जिल्हाधिका-यांनी त्यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठित करावी. या समितीत खालील प्रमाणे सदस्य असतील :-

| | |
|---|---|
| १) जिल्हाधिकारी | - अध्यक्ष |
| *२) आयुक्त महानगरपालिका/मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद मुख्याधिकारी नगरपालिका / नगर परिषद | - सदस्य |
| ३ ) जिल्हा पोलीस अधिक्षक | - सदस्य |
| ४) कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग | - सदस्य |
| ५) निवासी उप जिल्हाधिकारी | - सदस्य सचिव |

*( पुतळा ज्या क्षेत्रात बसवावयाचा आहे त्या क्षेत्रानुसार संबंधित अधिका-यांना आमंत्रित करावे. )

२. या समितीने खालील मार्गदर्शक तत्वे लक्षात घेऊन संपूर्ण कागदपत्रांसह प्रस्ताव मान्यतेसाठी शासनाकडे पाठवावा.

**पुतळे उभारण्यासंबंधीची मार्गदर्शक तत्वे**

१) कोणतीही व्यक्ती / संघटना /संस्था,शासनाच्या /स्थानिक नोंदणीकृत संस्थेच्या/ ग्रामपंचायतीच्या/ नगरपालिकेच्या/महानगरपालिकेच्या/निम शासकीय संस्थेच्या मालकीच्या जागेवर शासनाच्या परवानगी शिवाय पुतळे उभारु शकणार नाही.

२) पुतळे उभारण्याच्या जागेच्या मालकी हक्काबाबत वाद नसावा. ती जागा अनधिकृत किंवा अधिक्रमित केलेली नसावी. जागेच्या मालकी हक्काबाबत संबंधीत पुतळा बसविणा-या समितीने कागदपत्रे सादर करणे आवश्यक आहे. पुतळा उभारणा-या संस्थेचा पुतळ्याच्या जमिनीवर कोणताही हक्क असणार नाही.

३) पुतळा बसविणा-या समितीने पुतळ्याच्या चबुत-यांचे मोजमापे, आराखडा, पुतळयाचा साईट प्लॅन, पुतळा ज्या धातू/साहित्या पासून तयार करण्यात येणार आहे त्या धातू/साहित्याचे प्रमाण, पुतळ्याचे वजन, उंची व रंग याचा तपशिल पुतळ्याच्या रेखाचित्रासोबत मुख्य वास्तू शास्त्रज्ञ महाराष्ट्र राज्य यांना सादर करुन त्यांची मान्यता घेऊन प्रस्तावासोबत सादर केली पाहिजे.

४) पुतळा उभारणा-या संस्थेने पुतळयाच्या क्ले मॉडेलला कला संचालनालयाची मान्यता घ्यावी व ती प्रस्तावासोबत जोडावी.

५) पुतळे उभारताना जागेचे स्थान महत्व लक्षात घेण्यात यावे व शहराच्या सौंदर्यात बाधा येणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

६) पुतळा उभारल्यामुळे भविष्यात कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होणार नाही,स्थानिक वाद किंवा जातीय तणाव वाढणार नाही याबाबत सविस्तर चौकशी करुन संबंधित पोलिस कार्यालय प्रमुखांचे 'ना-हरकत प्रमाणपत्र' प्रस्तावा सोबत जोडणे आवश्यक आहे. तसेच पुतळा उभारण्यासाठी अल्पसंख्यकांची /लोकांची इच्छा लक्षात घेणे आवश्यक असल्याने त्याचा उल्लेख देखील उपरोक्त ना हरकत प्रमाणपत्रात असणे आवश्यक आहे.

७) स्थानिक स्वराज्य संस्था / निम शासकीय संस्था / शासकीय कार्यालये यामध्ये पुतळा उभारावयाचा झाल्यास संबंधीत मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडून घेतलेले ना हरकत प्रमाणपत्र प्रस्तावा सोबत असावे.

८) स्थानिक स्वराज्य संस्था यांनी पुतळा उभारण्याबाबत आवश्यक तो ठराव करुन प्रस्तावा सोबत जोडणे आवश्यक आहे.

९) पुतळा उभारल्यामुळे वाहतुकीस व रहदारीस अडथळा होणार नाही या बाबतचे प्रमाणपत्र प्रस्तावासोबत जोडावे.

१०) भविष्यात रस्ते रुंदीकरण वा अन्य विकास कामामुळे पुतळे हलविण्याचा प्रसंग आल्यास त्यास पुतळा उभारणा-या संस्थेचा विरोध राहाणार नाही व संबंधीत संस्था पुतळा हलविण्याबाबत सर्व खर्च व कार्यवाही करेल असे शपथपत्र घेण्यात यावे.

११) पुतळ्याची देखभाल मांगल्य व पावित्र्य राखण्याची जबाबदारी पुतळा उभारणा-या संस्थेवर राहील. संस्थेकडून तसे करारपत्र लिहून घेण्यात यावे.

१२) पुतळा उभारण्याबाबत संबंधित पुतळा उभारणारी संस्था सर्व दृष्टीकोनातून सक्षम आहे काय याची छाननी करण्यात यावी.

१३) पुतळयासंबंधीचा सर्व खर्च पुतळा उभारणारी संस्था करील व शासनाकडे कोणत्याही निधीची मागणी करणार नाही असे वचनपत्र संस्थेकडून घ्यावे.

१४) शासनाच्या पूर्व परवानगी शिवाय एखाद्या व्यक्तीने/संस्थेने/ समितीने पुतळा उभारल्यास अशा व्यक्ती/संस्था/समितीवर कार्यवाही करण्यात यावी व अशा प्रकरणात जिल्हाधिकारी निश्चीत करतील त्यानुसार दंड आकारण्यात यावा.

१५) पुतळ्याला मान्यता देताना जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षतेखाली समितीने महसूल व वन विभाग,गृह विभाग,सार्वजनिक बांधकाम विभाग व ग्रामविकास व जलसंधारण विभाग यांनी निर्गमित केलेल्या शासन आदेश/परिपत्रक यातील सुचना लक्षात घ्याव्यात व त्या संदर्भातील आपले अभिप्राय स्पष्टपणे व्यक्त करावेत.

१६) पुतळा उभारण्यास अनुमती द्यावी किंवा कसे याबाबत जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीची शिफारस स्पष्टपणे शासनास कळविण्यात यावी व त्या मागील कारणमिमांसा देण्यात यावी.

वरील सूचना केवळ मार्गदर्शक सूचना असून या व्यतिरिक्त स्थानिक प्रशासनाची निकड लक्षात घेऊन अन्य मानके निश्चित करण्याचे अधिकार जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीला रहातील. पुतळा बसविण्याची मागणी करणा-या संस्था/समितीने जिल्हाधिका-याकडे अर्ज केल्यानंतर त्याबाबतचा अहवाल जिल्हाधिका-यांनी जास्तीतजास्त तीन महिन्यांच्या आत शासनास सादर करावा. सदर शासन निर्णयास व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
**र.द.मांढे**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत :-

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव,
४) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
५) सचिव व विशेष चौकशी अधिकारी (२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) सह सचिव, मुख्य सचिव, यांचे कार्यालय,
७) सर्व सचिव,
८) सर्व मंत्रालयीन विभाग,
९) कला संचालक, महाराष्ट्र राज्य/मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०) सर्व विभागीय आयुक्त,
११) सर्व जिल्हाधिकारी,
१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१३) आयुक्त, सर्व महानगरपालिका,
१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१५) सर्व जिल्हा पोलिस अधिक्षक,
१६) निवड नस्ती (का.क्र.२९ ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.